**प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, औरंगाबाद यांच्या कार्यक्षेत्रातील शासकीय आश्रमशाळा, सुरडी, ता.आष्टी, जि.बीड येथील पाणी पुरवठा योजनेच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत....**

महाराष्ट्र शासन
आदिवासी विकास विभाग,
शासन निर्णय क्रमांक : पापुयो-२०१०/प्र.क्र.११६/का.१३
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- ४ ऑगस्ट, २०१०.

**वाचा** :- १) पाणी पुरवठा व स्वछता विभाग शासन निर्णय क्र.ग्रापाधो-११०९/प्र.क्र.१०४/पापु-०७, दि.१ ऑगस्ट, २००९.
२) आयुक्त, आदिवासी विकास,नाशिक यांचे पत्र क्र.पापुयो.२००९/प्र.क्र.७१/का.८(२), दि.२८/१/२०१०

**शासन निर्णय** :- आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक यांनी त्यांचे उपरोक्त दिनांक २८/१/२०१० च्या पत्रान्वये प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, औरंगाबाद यांच्या कार्यक्षेत्रातील शासकीय आश्रमशाळा, सुरडी, ता.आष्टी, जि.बीड येथील पाणी पुरवठा योजनेचे रु.१४,९८,४००/- इतक्या रकमेचे अंदाजपत्रक प्रशासकीय मान्यता देण्यासाठी शासनास सादर केले आहे.

२. सदर अंदाजपत्रक उप अभियंता, ग्रामिण पाणी-पुरवठा जिल्हा परिषद उपविभाग, आष्टी यांनी तयार केले असून प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, औरंगाबाद, संबंधित शाळेचे मुख्याध्यापक, कार्यकारी अभियंता ग्रामिण पाणी-पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, जि.बीड यांनी साक्षांकीत केले आहे.

३. उपरोक्त शासकीय आश्रमशाळेचे अंदाजपत्रक सन २००८-०९ च्या महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांच्या दरसूचीवर आधारित आहे. तसेच कार्यकारी अभियंता, ग्रामिण पाणी-पुरवठा जिल्हा परिषद, बीड यांनी रु.१४,९८,४००/- इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास तांत्रिक मान्यता दिलेली आहे. सदर काम पाणी पुरवठयाचे असून प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, औरंगाबाद यांचे कार्यक्षेत्रातील उपरोक्त शाळेच्या पाणी पुरवठयाच्या रु.१४,९८,४००/-(रुपये चौदा लाख अठ्ठयानव हजार चारशे फक्त) इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

४. सदर पाणी पुरवठ्याचे काम उपरोक्तप्रमाणे प्रशासकीय मान्यता देण्यात आलेल्या रु.१४,९८,४००/- इतक्या रकमेतच करण्यात यावे व यासाठी भविष्यात कोणतीही वाढीव रक्कम अनुज्ञेय राहणार नाही.

५.	मा.उच्च न्यायालय, मुंबई यांनी सु मोटो रिट याचिका क्र.१४२०/२००८ प्रकरणी वेळोवेळी दिलेल्या निर्देशानुसार शासकीय आश्रमशाळांमध्ये चांगल्या सोयीसुविधा पुरविणे आवश्यक आहे. सदर काम सुरु होण्यापूर्वी व काम पूर्ण झाल्यावर त्याचे व्हीडीओ शुटींग करुन त्याची सी.डी.शासनास सादर करण्यात यावी.

६.	सदर पाणी पुरवठा योजनेचा खर्च सन २०१०-११ या वर्षाकरिता मंजूर असलेल्या तरतूदीमधून भागविण्यात यावा.

७.	शासन निर्णय, वित्त विभाग क्र.विअप्र-१०.०८/प्र.क्र.७०/२००८/विनियम, दिनांक १५ मे, २००९ मधील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८, भाग-पहिला, उपविभाग-पाच मधील अ.क्र.१ व सा.बां.विभाग नियम पुस्तिकेतील परिच्छेद १३४ नुसार प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

८.	सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यांत आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक **२०१००८०४१९१५१४००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

( ला.रा.गुजर )
अवर सचिव

**प्रति,**

महालेखापाल (लेखा परिक्षा), (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई.
महालेखापाल (लेखा परिक्षा), (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, नागपूर.
आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
अपर आयुक्त, आदिवासी विकास,अमरावती.
अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ,,अमरावती.
प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, औरंगाबाद.
जिल्हा कोषागार अधिकारी, बीड.
कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, बीड.
उप विभागीय अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा, जिल्हा परिषद, उपविभाग, आष्टी.
पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई -३२.
कक्ष अधिकारी (का.६), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
निवड नस्ती (का.१३), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२